**काळ-कुंभे जलविद्युत प्रकल्प, जि. रायगड.**
**<u>चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता</u>.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक: जविप्र २०१८/(प्र.क्र.२३४/२०१८)/जवि,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १३.०३.२०२४.

**पहावे:** १) शासन निर्णय, क्रमांकः जविप्र १००३/(१६३/२००३) जवि दि. २८.०६.२००४

२) शासन निर्णय, क्रमांकः जविप्र १२०९/(१९९/२००९) जवि, दि. ३१.१२.२००९.

३) शासन निर्णय, क्रमांकः जविप्र १२१०/(२६७/२०१०) जवि, दि. ०६.०१.२०११.

**<u>प्रस्तावना:-</u>**

काळ - कुंभे प्रकल्प कोकण पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्या अखत्यारित असून पश्चिमवाहिनी नदीखोऱ्यातील सावित्री उपखोऱ्यात आहे. काळ - कुंभे जलविद्युत प्रकल्पांच्या मुळ संकल्पनानुसार काळ जलविद्युत प्रकल्पास रु.९८९९.६९ लक्ष रकमेस व कुंभे जलविद्युत प्रकल्पाच्या रु.९७२४.३१ लक्ष रकमेस सन १९९८ मध्ये स्वतंत्रपणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली होती.

या प्रस्तावानुसार काळ-कुंभे जलविद्युत प्रकल्पांतर्गत असलेला कुंभे जलविद्युत प्रकल्प रायगड जिल्ह्यातील माणगाव तालुक्यात कुंभे येथे सावित्री नदीची उपनदी निराबाई नदीवर नियोजित असून त्याअंतर्गत एक माती धरण बांधण्यात येऊन १० मे.वॅट स्थापित क्षमतेचे जलविद्युत केंद्र प्रस्तावित होते. तसेच काळ जलविद्युत प्रकल्प रायगड जिल्ह्यातील महाड तालुक्यात वारंगी येथे सावित्री नदीची उपनदी काळ नदीवर नियोजित असून, त्याअंतर्गत एक माती धरण बांधण्यात येऊन १५ मे.वॅट स्थापित क्षमतेचे जलविद्युत केंद्र कोंझर येथे प्रस्तावित होते.

तदनंतर सन २००४ मध्ये काळ व कुंभे जलविद्युत प्रकल्पाच्या एकत्रित नियोजनानुसार प्रकल्पास प्रथम सुप्रमा प्रदान करण्यात आली. यानुसार कुंभे जलविद्युत प्रकल्पांतर्गत (१ X १० मे.वॅ.) वीजनिर्मितीनंतरचे अवजल पुन्हा निराबाई नदीत न सोडता काळ नदीत सोडले जाणार होते. तसेच काळ प्रकल्पाच्या मुक्त पाणलोट क्षेत्रातील येव्यासह हे कुंभे जलविद्युत प्रकल्पाचे अवजल काळ धरणात साठवून काळ जलविद्युत प्रकल्पाद्वारे १५ मे.वॅट विद्युत निर्मितीनंतरचे अवजल गांधारी नदीत सोडणे प्रस्तावित होते. यासाठी काळ जलविद्युत प्रकल्पाचे अवजल गांधारी नदीवर वळण बंधारा बांधुन गांधारी सिंचन प्रकल्पासाठी वापरणे प्रस्तावित करण्यात आले. यास्तव काळ जलविद्युत प्रकल्पाच्या धरणाचा ५० टक्के खर्च गांधारी सिंचन प्रकल्पावर वर्ग करण्याचे ठरविण्यात आले व त्याअनुषंगाने प्रशासकीय मान्यता सुधारीत करुन काळ व कुंभे जलविद्युत प्रकल्पाच्या एकत्रितरित्या रु.१९४८७.१२ लक्ष रकमेस सन २००४ मध्ये प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली.

प्रकल्प खर्चात झालेली वाढ विचारात घेऊन सन २००९ मध्ये सदर काळ व कुंभे जलविद्युत प्रकल्पाच्या रु. ३७६४१.७४ लक्ष किंमतीस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता तसेच सन २०११ मध्ये रु. ७४०४४.०८ लक्ष किंमतीस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली.

शासन मान्यतेस्तव सादर करण्यात आलेल्या चतुर्थ सुप्रमा अहवालामध्ये गांधारी वळण बंधा-याची प्रशासकीय मान्यता व्यपगत झाली असल्याने सदर वळण बंधारा वगळण्यात आला आहे. या कारणामुळे तसेच दरसुचीतील वाढ व इतर कारणांमुळे झालेली वाढ यामुळे पारंपारीक जलविद्युत प्रकल्पाच्या दृष्टीने हा प्रकल्प अव्यहार्य ठरत आहे.

राज्यात दि. २०.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे सार्वजनिक खाजगी भागीदारीद्वारे उदंचन जलविद्युत प्रकल्प (PSP) आणि सहस्थित  उदंचन जलविद्युत प्रकल्प सौर / इतर अपारंपारीक संकरित प्रकल्पांच्या विकसनासाठीचे धोरण निर्गमित करण्यात आले आहे. सदर धोरणात उदंचन जलविद्युत प्रकल्प विकसनासाठी खाजगी विकासकास जलाशय भाडेतत्वावर हस्तांतरीत केल्यास रु. १.३३ लक्ष प्रति मेवॅ / प्रतिवर्ष / जलाशय भाडेपट्टी शासनास महसुल स्वरुपात प्राप्त होईल. या तरतुदीस अनुसरुन काळ व कुंभे या प्रकल्पांच्या धरणांची उर्वरीत कामे तसेच दीर्घ काळापासून प्रलंबीत असलेली पुनर्वसन कामे पुर्ण करण्यासाठी प्रस्तूत धरणांच्या भाडेपट्टीव्दारे मिळणा-या महसुलाची तसेच इतर पर्यायांव्दारे प्राप्त होणा-या महसुलाशी सांगड घालून व्यवहार्यता तपासण्याची बाब विचाराधीन होती.

यानुसार क्षेत्रिय स्तरावर याबाबतची तपासणी करुन काळ कुंभे प्रकल्पाची दोन्ही धरणे तसेच पुनर्वसन कामे पूर्ण करण्यासाठी प्रस्ताव सादर करण्यात आला. याअनुषंगाने प्रकल्पास चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

काळ-कुंभे एकत्रित जलविद्युत प्रकल्पाच्या सन २०२१-२२ चे दरसूचीवर आधारित रु. १६७००८.६९ लक्ष ( रुपये एक लक्ष सदुसष्ट हजार आठ लक्ष एकोणसत्तर हजार ) इतक्या किंमतीस खालील अटींच्या अधीन राहून चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. प्रकल्पाच्या तरतुदींचा उपशीर्ष निहाय गोषवारा सोबत "परिशिष्ट-अ" मध्ये जोडला आहे.

**<u>इतर अटी</u> :-**

१. प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

२. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. यासंदर्भात प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहीत केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

३. सदर प्रकल्पांसंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपद्धतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक अनियमितता निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना सहमती आहे असे गृहीत धरता येणार नाही.

४. सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

५. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करु नये.

६. काळ-कुंभे जलविद्युत प्रकल्पाचे पुनर्वसन हे पुनर्वसनाच्या मंजूर आराखड्यानुसार आवश्यक असल्याने, प्रकल्पाच्या पुनर्वसन आराखड्यास सक्षम स्तरावर मान्यता घेणे आवश्यक आहे. सदर कार्यवाही क्षेत्रिय स्तरावर प्राथम्याने करण्यात यावी.

७. प्रकल्पाच्या निष्फळ ठरणाऱ्या विद्युत साधनसामग्रीची विहीत पद्धतीने विनियोग / लिलाव करुन जास्तीत जास्त महसूल मिळविण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय अधिका-यांची असेल.

८. कुंभे प्रकल्प उदंचन प्रकल्प म्हणून राबविणेसंबंधी NTPC यांनी दर्शविलेले स्वारस्य तसेच काळ धरणातून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकरीता २० द.ल.घ.मी. पाणी औद्योगिक वापरासाठी आरक्षित ठेवण्याकरिता केलेली मागणी विचारात घेता NTPC तसेच औद्योगिक विकास महामंडळ यांचेसोबत सामंजस्य करार करण्याची कार्यवाही सत्वर करण्यात यावी.

९. या प्रकल्पावर होणारा खर्च "४८०१- वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१ जलविद्युत निर्मिती, जलविद्युत योजना, कुंभे व काळ जलविद्युत प्रकल्प, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा, व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय दि. २९.०२.२०२४ रोजी झालेल्या मा. मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३१३१८११०८३९२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=a6ed48fac9cffe22f8b946d38d8e2e2fa82aaab527c88c93f7b0dbdb50f0b562, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=33920684CC4219BA0C032228E6FCB8E71C1AD22733A9255E354DE8029E9E8160, cn=PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
Date: 2024.03.13 18:20:51 +05'30'

**सहपत्रः** परिशिष्ट-अ.

**( प्रसाद नार्वेकर )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

१. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा/ विभान परिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे.
१३. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. मुख्य अभियंता (ज.सं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कोषाधिकारी, ठाणे.
१६. मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
१७. मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, जलसंपदा विभाग, मुंबई.
१८. अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
१९. अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे.
२०. अधीक्षक अभियंता, कोयना (विवयां) संकल्पचित्र मंडळ, पुणे.
२१. उपसचिव (जवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. अर्थ संकल्प १/२ कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. निवडनस्ती.

**परिशिष्ट-अ**

**शासन निर्णय क्रमांक : जविप्र २०१८/प्र.क्र.२३४/२०१८/जवि, दि. १३.०३.२०२४ सोबतचे सहपत्र.**

**उपशीर्षनिहाय तरतुदीचा गोषवारा**

( रु. लक्ष )

| अ.क्र. | उपशीर्ष | काळ जलविद्युत प्रकल्प | | | कुंभे जलविद्युत प्रकल्प | | | एकंदरीत तरतुद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | स्थापत्य कामे | विद्युत कामे | एकूण | स्थापत्य कामे | विद्युत कामे | एकूण | |
| १ | अ- सर्वेक्षण | ३२६.७८ | ०.०० | ३२६.७८ | २८०.०१ | ०.०० | २८०.०१ | ६०६.७९ |
| | ब- भूसंपादन | १७४९७.१ | ०.०० | १७४९७.०९ | ३१८०.३९ | ०.०० | ३१८०.३९ | २०६७७.४८ |
| | क-बांधकामे | | | | | | | |
| | १. धरण- सांडवा पुच्छकालवा | ९५०२३.५२ | ०.०० | ९५०२३.५२ | १६५५८.६७ | ०.०० | १६५५८.६७ | १११५८२.१९ |
| | २. जल वहन प्रणाली | ४५७५.५१ | ०.०० | ४५७५.५१ | ५८३०.०७ | ०.०० | ५८३०.०७ | १०४०५.५८ |
| | ज- विद्युत कामे संच व स्थापत्य कामे | | | | | | | |
| | १. दाबनळी | ० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ० |
| | २.विद्युतगृह | २६४.९८ | ०.०० | २६४.९८ | ४१९.८१ | ०.०० | ४१९.८१ | ६८४.७९ |
| | ३.पुच्छ कालवा | ० | ०.०० | ०.०० | ९.८९ | ०.०० | ९.८९ | ९.८९ |
| | ४.यांत्रिकी उपकरणे | २५.११ | ०.०० | २५.११ | २३७.७२ | ०.०० | २३७.७२ | २६२.८३ |
| | क-इमारती | २८५.१२ | ०.०० | २८५.१२ | १६६.३८ | ०.०० | १६६.३८ | ४५१.५ |
| | म- वनीकरण | ६३.९९ | ०.०० | ६३.९९ | ३३९.३३ | ०.०० | ३३९.३३ | ४०३.३२ |
| | ओ- संकीर्ण | २००० | १६८.०३ | २१६८.०३ | १५०४.८७ | ९०.८६ | १५९५.७३ | ३७६३.७६ |
| | प — परिरक्षण | २६६.५८ | ०.०० | २६६.५८ | ६६०.७६ | ०.०० | ६६०.७६ | ९२७.३४ |
| | क्यू- विशेष हत्यारे व अवजारे | २.५ | २८.९७ | ३१.४७ | १५०.०० | ५.९५ | १५५.९५ | १८७.४२ |
| | र - दळणवळण | १३७.०४ | ०.०० | १३७.०४ | ३९९६.५२ | ०.०० | ३९९६.५२ | ४१३३.५६ |
| | एस —विद्युत यांत्रिकी उपकरणे | ० | २२९१.०४ | २२९१.०४ | | २३६३.९४ | २३६३.९४ | ४६५४.९८ |
| | क्ष - पर्यावरण | ४०.४१ | ०.०० | ४०.४१ | ८६.०० | ०.०० | ८६.०० | १२६.४१ |
| २ | आस्थापना व इतर | १६३१.६६ | ३०८४.१६ | ४७१५.८२ | ४६९.३९ | ३०६७.६४ | ३५३७.०३ | ८२५४.८५ |
| ३ | जमा व वसूली | -२ | ० | -२ | -१२०.०० | ०.०० | -१२०.०० | -१२२ |